**महाराष्ट्र शिक्षण सेवा ,गट-क व जिल्हा तांत्रिक सेवा , गट-क संवर्गातील कर्मचाऱ्यांना उपशिक्षणाधिकारी व तत्सम पदावर निवडीद्वारे नियुक्तीसाठी महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-ब (प्रशासन शाखा), मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षा -२०१७.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक:- विभाप-३३१७/प्र. क्र.३०४/प्रशा-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२
दिनांक:-१६ ऑक्टोबर, २०१८

वाचा :- १) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन अधिसूचना क्र.सेप्रनि-४७१६/प्र.क्र.१३/प्रशा-२, दिनांक, ५ जुलै, २०१६

२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन परिपत्रक क्र. बिंदूना ३०१६/प्र.क्र.२५१/प्रशा-२, दिनांक,१७ मे, २०१७.

**शासन परिपत्रक :-**

महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-क व जिल्हा तांत्रिक सेवा, गट-क संवर्गातील कर्मचाऱ्यांना शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या अधिपत्त्याखालील महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-ब (प्रशासन शाखा) अंतर्गत उपशिक्षणाधिकारी व तत्सम पदावर निवडीद्वारे नियुक्ती देण्यासाठी रविवार, दिनांक १३ ऑगस्ट, २०१७ रोजी महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत १२३ रिक्त पदांसाठी महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-ब (प्रशासन शाखा) मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षा-२०१७ मुंबई येथे घेण्यात आली आहे. संदर्भाधीन शासन अधिसूचना व परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले आहेत.

२. शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या अधिसूचनेध्ये मर्यादित विभागीय परीक्षा- २०१७ द्वारे भरण्यात येणाऱ्या उपशिक्षणाधिकारी व तत्सम पदावर १२३ पदांसाठी प्रवर्गनिहाय आरक्षण दर्शविण्यात आले आहे. तथापि, मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्रमांक २७९७/२०१५ प्रकरणी दिनांक ४ ऑगस्ट, २०१७ रोजी दिलेल्या निर्णयान्वये दिनांक २५ मे, २००४ चा शासन निर्णय रद्द करून पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरविले आहे. मा. उच्च न्यायालयाच्या सदरहू निर्णयाविरूध्द मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल करण्यात आलेली विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ मध्ये मा. सर्वोच्च न्यायालयाने कोणतीही स्थगिती दिलेली नाही. अथवा परिस्थिती “जैसे-थे” ठेवण्याबाबत कोणतेही आदेश दिलेले नाहीत.

३. सबब, मा. सर्वोच्च न्यायालय यांनी दिलेले आदेश विचारात घेता, उपशिक्षणाधिकारी व तत्सम पदावरील पदोन्नतीसाठी घेण्यात आलेली मर्यादित विभागीय परीक्षेसाठी आरक्षण लागू असणार नाही. सबब, उपरोक्त शासन अधिसूचना / परिपत्रकान्वये जाहीर करण्यात आलेली उपशिक्षणाधिकारी व तत्सम पदासाठी मर्यादित विभागीय परीक्षा- २०१७ द्वारे भरण्यात येणारी १२३ पदे ही गणवत्तेनुसार भरण्यात यावीत.

४. सदर शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभागाने दिलेल्या सहमतीस अनसरून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८१०१७१८०६५१६४२१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Pralhad Ate

Digitally signed by Ravindra Pralhad Ate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sport Departrment, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fd5fc4fce5f6732e6657dca817ae6ee619a55d170d3c93eff53c3ca69d1a772d, serialNumber=eaa37af2edb5809b000f33d26328f6cdac80ee32afdac3f68b5821d14e41dffa, cn=Ravindra Pralhad Ate
Date: 2018.10.17 19:07:10 +05'30'

(र. प्र. आटे)
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
२) सचिव (साविस), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
३) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग (पत्राने), मुंबई
४) आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे

**प्रत माहितीसाठी**

१) मा. मंत्री शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहायक
२) मा. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३) निवडनस्ती